मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पासाठी
निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीसीटी-३११९/प्र. क्र.८८/पोल-३**
गृह विभाग, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १६.०३.२०२३

<u>वाचा</u> -

१. गृह विभाग, शासन निर्णय क्र. आयएसएस १००९/प्र.क्र.३१३/विशा-४, दि.२७.०७.२०११.
२. गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.३१३ (भाग-२)/विशा-४, दि.६.०१.२०१२.
३. महाराष्ट्र शासन आणि मे. लार्सन अँड टुब्रो कंपनी यांचे दरम्यान दि.७.२.२०१५ रोजी झालेला करार.
४. शासनाचे क्र.सीसीटी ३११५/प्र.क्र.२१/पोल-३,दि.७.२.२०१५ चे कार्यादेश.
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.२०१५
६. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दि.१८.४.२०१७
७. गृह विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/प्र. क्र. ६४/विशा -३(अ), दि.०४.०८.२०१७.
८. गृह विभाग, शासन पत्र क्र.३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दिनांक ०८.११.२०१७.
९. गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.०५.११.२०१८.
१०. गृह विभाग, शासन निर्णय क्र.सीसीटी-३११५/प्र.क्र.२१/भाग-२/पोल-३, दि.२६/२/२०१९
११. पोलीस उप आयुक्त (अभियान), मुंबई यांचे क्र.O.W.No.DCP/OPS/४५५/२०२३, दि.१४/२/२०२३ व क्र.जा.क्र.पोउआ/अभियान/५९५/२०२३, दि.६/३/२०२३ चे पत्र
१२. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२२/९/२०२२ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त, दि.२०/१०/२०२२ चे पत्र व दि.१६/२/२०२३ रोजी झालेल्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीचे इतिवृत्त, दि.२३/२/२०२३ चे पत्र
१३. प्रकल्प संचालक, मे.लार्सन अँड टुब्रो कंपनीची दिनांक १०/३/२०२३ रोजीची पत्रे व त्यासोबत सादर केलेली देयके.
१४. प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने दिनांक २९/७/२०२१ व दि.८/३/२०२३ रोजीच्या ई मेल संदेशाद्वारे सादर केलेला अहवाल.

<u>प्रस्तावना</u>-

मुंबई शहरात सुरक्षेच्या दृष्टीने सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनी लि. या कंपनीसोबत दि.०७.०२.२०१५ रोजी शासनाने करार केला आहे. सदर करारानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाची एकूण किंमत रु.९४९ कोटी एवढी ठरविण्यात आली आहे. सदर प्रकल्पासाठी गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०१.२०१४ अन्वये एकूण रु.६०० कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि.०२.३.२०१६ अन्वये रु. ३४९ कोटी एवढया रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तद्नंतर गृह विभाग शासन निर्णय दि. ०५.११.२०१८ अन्वये रु.९८०,३३,८०,०२४/-(अक्षरी रुपये नऊशे ऐंशी कोटी तेहतीस लाख ऐंशी हजार चोवीस) एवढया रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तदनंतर गृह विभाग शासन निर्णय दि. २६.०२.२०१९ अन्वये मुंबई सीसीटीव्ही फेज-II सह एकूण रु.१३०३.५६ कोटी (अक्षरी

रुपये एक हजार तीनशे तीन कोटी छप्पन लाख) एवढ्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे अध्यक्षतेखालील प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि.८/२/२०२३ च्या पत्रातील शिफारशीनुसार, अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दि.१६/२/२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबतची १) BMC Variation Charges -- रु.२२.०६ कोटी (जीएसटी वगळून) २) Collaborative Monitoring -- रु.१.०३ कोटी (जीएसटी वगळून) ३) Dial १०० O & M Payment -- रु.२.४९ कोटी (जीएसटी सह) अशी एकूण रु.२५.५८ कोटी रक्कम प्रकल्प संचालक यांना अदा करणेबाबत मंजूरी देण्यात आली आहे. यामधील मुद्दा क्र.२) व ३) च्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.११ अन्वये पोलीस उप आयुक्त (अभियान) यांनी User Certificate सादर केले आहे.

त्यानुसार मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीने संदर्भाधीन क्र.१३ येथील दि.१०/३/२०२३ रोजीच्या पत्रांन्वये मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबतची उपरोक्त रक्कमेबाबतची देयके जीएसटीसह सादर केली. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने उपरोक्त संदर्भाधीन क्र.१४ येथील दिनांक २९/७/२०२१ व दि.८/३/२०२३ रोजी सादर केलेल्या अहवालानुसार सदर प्रकल्पाच्या १) BMC Variation Charges -- रु.२६,०३,४९,३१२/- २) Collaborative Monitoring -- १,२२,१०,१८२/- ३) Dial १०० O & M Payment -- रु.२,४९,५५,०६९/- अशी एकुण रु.२९,७५,१४,५६३/- (अक्षरी रुपये एकोणतीस कोटी पंचाहत्तर लाख चौदा हजार पाचशे त्रेसष्ट फक्त) एवढी रक्कम जीएसटीसह देय ठरत आहे. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दि.१६/२/२०२३ रोजीच्या उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या बैठकीत, मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबतची १) BMC Variation Charges -- रु.२२.०६ कोटी (जीएसटी वगळून) २) Collaborative Monitoring -- रु.१.०३ कोटी (जीएसटी वगळून) ३) Dial १०० O & M Payment -- रु.२.४९ कोटी (जीएसटी सह) अशी एकूण रक्कम रु.२५.५८ कोटी रक्कम प्रकल्प संचालक मे. लार्सन ॲन्ड टुब्रो कंपनीस अदा करणेबाबत मंजूरी देण्यात आली आहे.

२. त्यानुषंगाने प्रकल्प सल्लागार मे.पीडब्ल्युसी कंपनीने सादर केलेल्या अहवालानुसार मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाबाबतच्या रक्कमेकरिता प्रकल्प संचालक, मे.लार्सन ॲंड टुब्रो कंपनीस १) BMC Variation Charges -- रु.२६,०३,४९,३१२/- २) Collaborative Monitoring -- १,२२,१०,१८२/- ३) Dial १०० O & M Payment -- रु.२,४९,५५,०६९/- अशी एकुण रु.२९,७५,१४,५६३/- जीएसटीसह (अक्षरी रुपये एकोणतीस कोटी पंचाहत्तर लाख चौदा हजार पाचशे त्रेसष्ट फक्त) एवढी रक्कम वितरित करण्यास या आदेशान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

३. सदर रक्कमेची देयके कंपनीला अदा करतांना आयकर व इतर प्रचलित कर वजाती करुन अदा करण्यात यावी.सदर रकमेत जीएसटी कराचा समावेश आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी उपरोक्त प्रमाणे होणारा खर्च हा "मागणी क्र.बी-१०, ४०५५ - पोलीस यावरील भांडवली खर्च, ८०० इतर खर्च, (००) (०९) सीसीटीव्ही यंत्रणा बसविणे (४०५५ ०२२३) या अंतर्गत ५२- यंत्रसामग्री साधनसामग्री" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदरहु रक्कम आहरीत करण्यासाठी पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिका-याला आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन घोषीत करण्यात येत आहे. त्यांनी उपरोक्त निधी प्रकल्प संचालक Larsen & Toubro Ltd.-SW&C BU या कंपनीच्या १६३, अन्नासलाई, चेन्नई-६०० ००२ येथील सीटी बँकेच्या शाखेचे खाते क्र.०५२१४६६३०८ (IFSC Code - CITI००००००३) (MICR CODE OF THE BANK-६०००३७००२) या खात्यावर जमा करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१११/२०२३/व्यय-७, दि.२२/२/२०२३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. मुंबई शहर सीसीटीव्ही प्रकल्पाच्या थकीत रकमेचा निधी वितरीत करण्यास वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ मधील वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८ भाग-पहिला, उपविभाग-दोन, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार व अनु.क्र. २७ अ, नियम क्र.७६ अन्वये प्रशासकीय विभागाला असलेल्या अधिकार आहेत.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१४३८३६१२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2023.03.16 14:42:57 +05'30'

**( रुपाली कबरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा.उपमुख्यमंत्री, (गृह) यांचे प्रधान सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
८. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. मे. लार्सन अँड टुब्रो कं. लि, एल अँड टी हाऊस, एन. एम. मार्ग, बलार्ड इस्टेट, मुंबई-१.
१३. मे.प्राईसवॉटर हाऊस कुपर्स लि., २५२, वीर सावरकर मार्ग, दादर (प), मुंबई-४०० ०२८.
१४. वित्त विभाग, व्यय-७/वित्तीय सुधारणा.
१५. अर्थसं-१/गृह विभाग, मुंबई.
१६. रोख शाखा/ गृह विभाग, मुंबई.
१७. निवडनस्ती, पोल-३.